सोलापूर (बोरामणी) विमानतळासाठी अतिरिक्त जमीन संपादनास सुधारित प्रशासकीय मान्यता व सुधारित वित्तीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. मविवि-१६१९/प्र.क्र.५५/ २८-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ३२.
दि. २९ ऑक्टोबर, २०२०.

वाचा :१. शासन निर्णय क्र. एव्हीएन-१००८/प्र.क्र.५३८/०८/२८-अ, दि.१३ जून, २००८
२. शासन निर्णय क्र. एव्हीएन-२००९/प्र.क्र.५७१/२८-अ, दि.४ फ़ेब्रुवारी, २००८
३. शासन निर्णय क्र. एव्हीएन-१००८/प्र.क्र.५३८/२८-अ, दि.२३ सप्टेंबर, २००८
४. शासन निर्णय क्र. एमएडीसी-२०११/प्र.क्र.१४८/का२.८-अ, दि. २३ नोव्हेंबर, २०११
५. शासन निर्णय क्र. एमएडीसी-२०१२/प्र.क्र.३७७/२८-अ, दि. ६ सप्टेंबर,२०१२
६. शासन निर्णय क्र. भाविप्रा २७१३/प्र.क्र.१२३/२८-अ, दि.२१ ऑगष्ट,२०१३.
७. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र. मविविकं २०१४/प्र.क्र.१११/भुसं/१८१३, दि.०३/०३/२०२०.
८. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी, मुंबई यांचे पत्र क्र. मविविकं २०१४/प्र.क्र.१११/भुसं/०२७, दि.१७/०९/२०२०.

**प्रस्तावना :**

सोलापूर (मौजे बोरामणी व मौजे तांदुळवाडी) येथील विमानतळासाठी एकूण ५१० हे. आर. खाजगी जमीन संपादनासाठी तसेच त्यापोटी होणाऱ्या रु.७६.५० कोटी खर्चास शासन निर्णय दि.२३.०९.२००८ अन्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. याअनुषंगाने, आजपर्यंत रु.६९.५० कोटी इतका निधी शासनाने महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस वर्ग केलेला आहे.

२. प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या भूसंपादनाचे क्षेत्र जरी ५१० हे. असले, तरी सदर क्षेत्र अंदाजित असल्याने व संयुक्त मोजणीअंती संपादित करावयाच्या क्षेत्रामध्ये वाढ झाल्याने सन २०१० ते २०१२ या कालावधीत सुमारे ५४९.३१ हे.आर. क्षेत्र विमानतळासाठी संपादित केले असल्याचे महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने त्यांच्या दि.३.०३.२०२० रोजीच्या पत्रात नमूद केले आहे. याशिवाय, मौजे बोरामणी व मौजे तांदुळवाडी या दोन भिन्न गावांचा नकाशा एकत्र केल्याने सदर नकाशामध्ये काही गट नंबर आले नसल्याने ते संपादन करावयाचे राहून गेले आहेत. सदर गट नंबर प्रस्तावित विमानतळाच्या धावपट्टीमध्ये येत असल्याने त्यातील सुमारे २९.९४ हे.आर. क्षेत्र संपादित करणे आवश्यक असून यासाठी रु.३३,३८,५८,१००/- अतिरिक्त निधीची मागणी आहे.

३. त्यानूसार सोलापूर (बोरामणी) विमानतळासाठी एकूण सुमारे ५८० (५४९.३१ + २९.९४) हे.आर. भूसंपादनास सुधारित प्रशासकीय मान्यता घेणे आवश्यक आहे. तसेच, अतिरिक्त २९.९४ हे.आर. खाजगी जमीन संपादनापोटी होणाऱ्या रु.४६.२९ कोटी अतिरिक्त खर्चासह एकूण रु.१२२.७९ कोटी खर्चास सुधारित वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सोलापुर (बोरामणी) विमानतळाच्या भूसंपादनाबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

(१) सोलापूर (बोरामणी) विमानतळासाठी अतिरिक्त २९.९४ हे.आर. खाजगी जमीन संपादनासह एकूण **सुमारे ५८० हे. जमीन संपादनास सुधारित प्रशासकीय मान्यता** देण्यात येत आहे. तसेच अतिरिक्त २९.९४ हे.आर. खाजगी जमीन संपादनापोटी होणाऱ्या रु.४६.२९ कोटी अतिरिक्त खर्चासह **एकूण रु.१२२.७९ कोटी खर्चास सुधारित वित्तीय मान्यता** प्रदान करण्यात येत आहे.

(२) अतिरिक्त भूसंपादनासाठी आवश्यक रकमेपैकी **रु.४०.०० कोटी** निधी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष ३०५३ ०१६४ खाली उपलब्ध तरतुदीतून वितरीत करण्यास मान्यतादेण्यात येत आहे.

२. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक ए-७, ३०५३ नागरी विमानचालन, ०२ विमानतळ, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे, (००) (०२) विमानतळाच्या विकासाकरिता महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस सहायक अनुदान (कार्यक्रम) (३०५३ ०१६४)३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ करिता मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. याबाबत उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

३. वितरीत करण्यात येत असलेला सदरहू निधी सशर्त असून ज्या विकासकामांसाठी वितरीत करण्यात आला आहे, त्याच कामांसाठी तो विहीत मुदतीत खर्ची पडेल याची खबरदारी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने घ्यावी. तसेच, वितरीत निधी PLA अथवा बँक खात्यात जमा न करता विहीत प्रयोजनातूनच खर्च होण्याची खातरजमा कंपनीने करावी व खर्च करण्यात आलेल्या निधीबाबत वेळोवेळी आढावा घेऊन विहीत कालावधीत खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२९३/२०२०/व्यय-४, दि.०९.१०.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२०१०२९१६२२२९७७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sanjeev R Keluskar

Digitally signed by Sanjeev R Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, serialNumber=78be615e7dd51ebb89a43e2d8f1b14979bf8f5ae2c63e3a7fe41c5716996cd4b, cn=Sanjeev R Keluskar
Date: 2020.10.29 16:25:25 +05'30'

**( संजीव केळुसकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, (विमानचालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
२. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या, मुंबई
३. संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
४. विभागीय कार्यकारी अधिकारी, भारतीय विमानपत्तन प्राधिकरण (प.क्षे.), मुंबई
५. महालेखापाल, ( लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर.
७. उप संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी (कार्या.२५), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११.निवड नस्ती.